राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्यासाठी रु. १५० कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-४५२४/ प्र.क्र.१३३/८-अे**

मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२

दिनांक : ४ जुलै, २०२४

**संदर्भ :**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक कृयायो-०८१८/प्र.क्र.२३१/१४ अे, दि.१२.९.२०१८

२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४

३) कृषि संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय यांचे क्र. कृ.यां.उ.अ./गुनि-५/न.क्र. २१६/२०२४-२५/१५८१३, दि. १४.६.२०२४ चे पत्र

**प्रस्तावना :-**

राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राबविण्यास संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये, प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानातील घटक क्रमांक-३, वैयक्तिक लाभार्थी शेतकऱ्यांना कृषि औजारे/यंत्र खरेदीसाठी अनुदान देणे व घटक क्रमांक -४, कृषि औजारे/यंत्रे बँकाना अनुदान देणे या घटकांची अंमलबजावणी केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात येते.

राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी महा डिबीटी पोर्टलवर कृषि यांत्रिकीकरण उप अभियान योजने अंतर्गत प्राप्त अर्जांमधून सोडतीमध्ये यशस्वी ठरलेल्या व कामे पूर्ण केलेल्या लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप करण्यात येते.

या योजनेसाठी सन २०२४-२५ या वर्षात रु. २५०.०० कोटी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेस सन २०२४-२५ मध्ये रु.१५० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

१) सन २०२४-२५ या वर्षात राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी रू. १५०.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) निधीच्या कार्यक्रमास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर निधी सन २०२४-२५ करिता खालील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र.डी-३,
२४०१-पीक संवर्धन,
(११३) कृषि अभियांत्रिकी,
(००) (१८) राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना
(२४०१ ए ९१३) ३३ अर्थसहाय्य.

३) सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती / जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लाख यापैकी कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ४०% किंवा रु.१ लाख यापैकी कमी असेल ते या प्रमाणे अनुदान देण्यात यावे.

४) इतर बाबींसाठी योजनेची अंमलबजावणी करताना केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे व संदर्भाधीन दि. १२ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करावे.

५) सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेअंतर्गत निवडलेल्या लाभार्थ्यांना वितरीत होईल याची दक्षता घेण्यात यावी. या योजनेंतर्गत लाभार्थी निवडीबाबतची सोडत MAHADBT पोर्टलवरुन विहीत कार्य पध्दतीचा अवलंब करुन काढण्यात यावी. तसेच, अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांना महा-डीबीटी प्रणालीद्वारे आधारसंलग्न बँक खात्यावर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

६) सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/नियम/परिपत्रक/ अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C. तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही नियम/अधिकाराचा भंग होणार नाही याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील. तसेच सदर निधीचे आहरण कोषागारातून आवश्यकतेनुसार करण्यात यावे आणि बँक खात्यात अखर्चित निधी शिल्लक राहाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

७) या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेतील लाभार्थींना वितरीत करण्यात यावा.राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणी करण्यासाठी संचालक (नि. व. गु.नि), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उद्दिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. तसेच महिला शेतकरी, अनुसूचित जाती व

अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी भौतिक/ आर्थिक लक्षांक निर्धारीत करण्यात यावे.

८) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. १ एप्रिल, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

९) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०४१६१७३९०००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.07.04 16:32:38 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (कृषि), मंत्रालय,मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
५) संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
६) सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
८) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
१०) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११) नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ), मंत्रालय, मुंबई -३२
१३) निवड नस्ती (कार्यासन -८अे), मंत्रालय, मुंबई -३२